मोटार अपघात दावा न्यायाधिकरण
विशेष सरकारी वकिल यांच्या सुधारित फी मंजुरीबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-१२९९/२२१०/प्र.क्र.९४/परिवहन-५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : १७ फेब्रुवारी २००५.

वाचा :- १) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. एमएसीटी-२८९४/२०००, दिनांक ३१.१०.२०००.
२) मोअदान्या/१५०३/२००२, दिनांक ९.४.२००२.

प्रस्तावना :- मोटार अपघात दावा न्यायाधिकरण येथे अपघातात बळी पडलेल्या व्यक्तीच्या नातेवाईकांचे किंवा जखमी झालेल्या आपादग्रस्ताच्या नुकसानभरपाईचे दावे दाखल करण्यात येत आहेत. सदर दावे मोटार वाहन अधिनियम, १९८८ च्या कलम १४० व १६६ नुसार निकाली काढण्यात येतात. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण येथे दाखल झालेल्या दाव्याबाबत शासनाची बाजू मांडण्यासाठी शासन विशेष सरकारी वकिलाची नेमणुक करते, यापुर्वी शासनाची बाजू मांडणाऱ्या विशेष सरकारी वकिलांना सन १९७८ पासून प्रत्येक दावा प्रकरणी रु.२५०/- (अडीचशे) फी व रिटेनर चार्जेस दरमहा रु. १००/- फी देण्यात येत होती. सदर फीमध्ये सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाचे विचाराधिन होता. याबाबत सविस्तर विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :- अपघातात बळी पडलेल्या व्यक्तीच्या नातेवाईकांना व अपघातात जखमी झालेल्या व्यक्तीला तातडीने मदत मिळण्यासाठी मोटार वाहन अधिनियम, १९८८ च्या कलम -१४० खाली दावे निकाली काढण्यासाठी त्याचप्रमाणे कलम १६६ खाली दावा अंतिम निकाली काढण्यासाठी शासनाच्या वतीने मोटार अपघात दावा न्यायाधिकरण येथे कामकाज पाहण्यासाठी नेमणुक करण्यात आलेल्या विशेष सरकारी वकीलास सुधारित दराने खाली नमूद केल्याप्रमाणे फी प्रदान करण्यास शासन मंजुरी देत आहे.

सुधारित दर तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | बाब | प्रत्येक दावा प्रकरणी द्यावयाची फी रुपये |
|---|---|---|
| १ | मोटार वाहन अधिनियम, १९८८ च्या कलम १४० खाली दावा निकाली काढण्यासाठी | १०००/-<br>(रुपये एक हजार फक्त) |

| | | |
|---|---|---|
| २ | मोटार वाहन अधिनियम, १९८८ च्या कलम १६६ खाली दावा अंतिम निकाली काढण्यासाठी | ५०००/-<br>(रुपये पाच हजार फक्त) |
| ३ | रिटेनर चार्जेस दरमाह | १०००/-<br>(रुपये एक हजार फक्त) |

सदर शासन निर्णय दिनांक १.११.२००४ पासून अंमलात येईल.

यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक ३ बी-२०४१ वाहनावरील कर ८००, इतर खर्च एक(१) कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-७१९/२००४/व्यय-८, दिनांक ३१.१०.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येतो.

(रमेश शिंदे)

उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व पिठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अपिलेट न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, बृहन्मुंबई/नागपूर,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/सहाय्यक लेखा अधिकारी, नागपूर,

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

वित्त विभाग, व्यय-८,

विधी व न्याय विभाग,

निवडनस्ती, परि-५, गृह विभाग.